GR-200407301409100001-1201

**प्रधानमंत्री ग्रामसडक योजना कार्यक्रमाच्या प्रशासकीय सनियंत्रण व तांत्रिक मार्गदर्शनासाठी राज्यस्तरीय समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-ग्रासयो/२००१/प्र.क्र.२८/यो.१,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक ३१ जुलै २००१.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक-जिपर-२०००/प्र.क्र.२३३/३५,दिनांक १७/१/२००१.
२) जिपर-२००१/प्र.क्र.८५४/३५,दिनांक २४ जानेवारी २००१.
३) जिपर-२०००/प्र.क्र.२३३/३५, दिनांक २५ सप्टेंबर २००१.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने देशातील विविध राज्यातील ग्रामीण भागातील एक हजार व पाचशे पेक्षा जास्त लोकसंख्या असलेली खेडी रस्त्याने जोडण्याची " प्रधानमंत्री ग्रामसडक योजना जाहीर केली. त्याअनुषंगाने ग्रामीण रस्ते बांधणीच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी २००७ पर्यंत पूर्ण करावयाची असून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे महाराष्ट्र राज्यातील जिल्हा स्तरीय प्रकल्प प्रस्तावास अंतिम स्वरुप देणे व तदनुषंगिक कामकाज पूर्ण करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २५ सप्टेंबर २००१ च्या शासन निर्णयान्वये राज्य स्तरीय स्थायी समितीची स्थापना करण्यात आलेली आहे.

या योजनेचा कालबध्द कार्यक्रम असल्याने मंत्रालयीन स्तरावर तांत्रिक मार्गदर्शनासाठी व एकूण योजनेचे सनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरावर सचिव, (ग्राम विकास) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय समिती या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | सचिव (ग्राम विकास) | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ | सदस्य |
| ३ | सह सचिव तथा मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ४ | उप सचिव (प्रधान मंत्री ग्राम सडक योजना) | सदस्य |

**सदर समितीची कार्यकक्षा:-**

१) प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेची कामे राबविताना येणा-या प्रशासकीय व तांत्रिक अडचणींचे निराकरण करणे.
२) रस्ते बांधणी, दर्जा सुधारणे, निविदा व गुण नियंत्रण या संदर्भातील तांत्रिक अडचणी सोडविणे.
३) सदर योजनेतील पुढील वर्षाचा प्रकल्प अहवाल केंद्र शासनासाठी सादर करण्यासाठी मार्गदर्शन करणे.

४) प्रशासकीय संनियंत्रण व तांत्रिक मार्गदर्शन करणे.

५) . समितीने प्रत्येक महिन्याच्या पहिल्या व तिस-या मंगळवारी सकाळी ११.०० वा. बैठक घेण्यात यावी.

जिल्हा परिषदांच्या योजनेच्या अंमलबजावणी बाबतच्या प्रशासकीय व तांत्रिक अडचणी समितीसमोर ठेवली जाईल. समितीमार्फत सदर अडचणींचे निराकरण केले जाईल. ज्या तांत्रिक व प्रशासकीय बाबी समितीच्या कक्षेबाहेरच्या असतील त्या संदर्भात तात्काळ केंद्र शासनाकडे तांत्रिक मार्गदर्शनासाठी पाठवण्यात करण्यात येईल. सदर समिती प्रधान मंत्री ग्राम सडक योजना अस्तित्वात असेपर्यंत कार्यरत राहील.

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३०८, दि. २०.७.२००२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सुनील पाटील )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सचिव, ग्राम विकास, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
सचिव, (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई- ४०० ०३२.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य विकास महामंडळ नेपियन्सी रोड, प्रियदर्शनी पार्क जवळ,मुंबई-४०० ०३६.
सहसचिव, तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
उप सचिव ( प्रधान मंत्री ग्राम सडक योजना ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
विभागीय आयुक्त ( सर्व )
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई,पुणे, नाशिक,औरंगाबाद, अमरावती, नागपूर
(विशेष प्रकल्प) मुंबई राष्ट्रीय महामार्ग विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
कार्यकारी अभियंता, (बांधकाम ) जि. प. (सर्व )
विशेष कार्याधिकारी, तथा उप विकास आयुक्त, (रोहयो) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व )
निवड नस्ती का.क्र.योजना-८ (४१), योजना-९ (३१)